<u>तात्पुरती निवडसूची सन २०१७-१८</u>
पोलीस महानिरीक्षक यांचे
"उपसहायक (गट-ब)" या पदावर
तात्पुरती पदोन्नती देणेबाबत.....

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन आदेश क्र: रापोसे-१११८/प्र.क्र.२४/पोल-१अ,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक :- ११ ऑक्टोंबर, २०१८.

**संदर्भ** :- पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र: पोमंस/८/६८० उपसहायक (१७-१८)/१९/२०१७, दि.१८.०८.२०१८.

<u>शासन आदेश</u> :-

पोलीस महासंचालक कार्यालयातील "पोलीस महानिरीक्षक यांचे उप सहायक (गट-ब)" या पदावर पदोन्नती देण्यासाठी तयार करण्यात आलेल्या सन २०१७-१८ च्या तात्पुरत्या निवडसूचीमध्ये समाविष्ट करण्यात आलेल्या खालील "वरिष्ठ कार्यालय अधीक्षक (गट-ब)" दर्जाच्या अधिकाऱ्यांस, "पोलीस महानिरीक्षक यांचे उप सहायक (गट-ब)" या पदावर तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | निर्देश सूची/ ज्येष्ठता यादी अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव व प्रवर्ग | निवडसूचीवरील समावेशनाचा प्रवर्ग |
|---|---|---|---|
| १ | ४ /४ | श्री. मिलिंद एकनाथ मांजरेकर (खुला) | खुला |

२. उपरोक्त अधिकाऱ्यांस पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत, महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. उपरोक्त अधिकाऱ्यांस विभागीय पदोन्नती समितीच्या बैठकीनंतर जर त्यांच्याविरुध्दच्या प्रलंबित/ प्रस्तावित विभागीय / संक्षिप्त / प्राथमिक चौकशी / न्यायालयीन कार्यवाहीच्या अनुषंगाने शिक्षा झाल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या दि. १५ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, पदोन्नती संदर्भात पुढील कार्यवाही करावी.

४. उपरोक्त पदोन्नती, मा. सर्वोच्च न्यायालय येथे दाखल करण्यात आलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ वर मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या, तसेच, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

५. सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी उपरोक्त अधिकाऱ्यांस नियमितपणा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क मिळणार नाही.

६. पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेल्या पदांवर मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण अथवा अन्य मा. न्यायालयाचे आदेश असल्यास ते विचारात घेऊन उक्त अधिकाऱ्यांस पदस्थापना देण्यात यावी.

७. उक्त पदोन्नती देण्यात आलेल्या अधिकाऱ्यांस, सध्याच्या पदावरून कार्यमुक्त करून, त्यांना पदोन्नतीच्या पदावर रूजू होण्यासाठी महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही त्वरित करावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१८१०१११६२७१६५८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kailas A. Gaikwad

Digitally signed by Kailas A. Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b31abfcb1894c4c597cc944f19a89f474e7b98a708cc03eb46cd241a604d42bb, cn=Kailas A. Gaikwad
Date: 2018.10.11 16:29:31 +05'30'

**(कैलास गायकवाड)**
**उप सचिव, गृह विभाग**

**प्रति,**

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रतिलिपी,**

१. महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री (गृह) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री (गृह) (शहर/ग्रामिण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
६. सामान्य प्रशासन विभाग (कार्या.१२), मंत्रालय, मुंबई.
७. संबंधित अधिकारी (पोलीस महासंचालक यांचेमार्फत)
८. निवडनस्ती (कार्या. पोल-१अ)